नागरी आदिवासी वस्ती सुधारणा योजनेअंतर्गत
**पांढरकवडा** नगरपरिषदेस (जि.यवतमाळ)
अनुदान वितरण करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
नगर विकास विभाग
**शासन निर्णय** क्र.आवसु-२०१०/प्र.क्र.१४९/नवि-४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २३ मार्च, २०११

__वाचा :-__ १) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.आवसु-१००६/प्र.क्र.८०/नवि-४ दिनांक ६ फेब्रुवारी, २००७
२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. नावयो-२०११/प्र.क्र.-६१/का.१२ दिनांक १९ मार्च, २०११

__शासन निर्णय :-__ नागरी आदिवासी वस्ती सुधारणा योजनेकरीता सन २०१०-११ या आर्थिक वर्षामध्ये एकूण **रुपये ५,००,००,०००/- (अक्षरी रुपये पाच कोटी )** इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. सदर मंजूर निधीपैकी पांढरकवडा नगरपरिषदेस (जि. यवतमाळ) खाली नमूद केलेल्या कामांना **रु.१,८३,२१,२४०/-** (रुपये **एक कोटी त्र्याऐंशी लक्ष एकवीस हजार दोनशे चाळीस)** इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नांव | अंदाजपत्रकीय रक्कम |
|---|---|---|
| १ | वॉर्ड क्रमांक-१७ मधील चेनेज २४० ते २९० मध्ये भाग-१ नाल्याचे मजबुतीकरण | रु.७४,८६,०००/- |
| २ | वॉर्ड क्रमांक-१७ मधील चेनेज २४० ते २९० मध्ये भाग-२ नाल्याचे मजबुतीकरण | रु.७,४८,६००/- |
| ३ | वॉर्ड क्रमांक-१७ मधील चेनेज २४० ते २९० मध्ये भाग-३ नाल्याचे मजबुतीकरणो | रु.७४,८६,०००/- |
| ४ | वॉर्ड क्रमांक-१७ मध्ये पाथवेचे बांधकाम करणे विठ्ठल बत्ते ते फोफारेचे घर | रु.२,२३,६२०/- |
| ५ | वॉर्ड क्रमांक-१७ मध्ये पाथवेचे बांधकाम करणे शै हैदरा ते तोडासामाचे घर | रु. ९,९४,०००/- |
| ६ | वॉर्ड क्रमांक-१७ मध्ये पाथवेचे बांधकाम करणे गोवर्धन तलमले ते मुस्ताकचे घर | रु. ७५,३००/- |
| ७ | वॉर्ड क्रमांक-१७ मध्ये पाथवेचे बांधकाम करणे नारायण ते बुल्ले ते तलमलेचे घर | रु. १,३७,६००/- |
| ८ | वॉर्ड क्रमांक-१७ मध्ये पाथवेचे बांधकाम करणे सुलभा शौचालया जवळ | रु. ८६,०१०/- |

| | | |
|---|---|---|
| ९ | वॉर्ड क्रमांक-१७ मध्ये पाथवेचे बांधकाम करणे वसंत खवसे ते रामदास साळुंखेचे घर | रु. १,३७,६१०/- |
| १० | वॉर्ड क्रमांक-१७ मध्ये पाथवेचे कव्हर्ड पाईप ड्रेनचे बांधकाम करणे मुस्ताक ते सुलभ शौचालय | रु. ३,४६,९००/- |
| ११ | वॉर्ड क्रमांक-१७ मध्ये ड्रेनचे बांधकाम करणे | रु. १,२७,१००/- |
| १२ | वॉर्ड क्रमांक-१७ मध्ये ड्रेनचे बांधकाम करणे | रु. ४,७२,५००/ |
| | **एकूण** | रु.१,८३,२१,२४०/- |

०२. जिल्हाधिकारी, यवतमाळ यांनी सदर योजनेस शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.आवसु-१००६/प्र.क्र.८०/नवि-४ दिनांक ६ फेब्रुवारी, २००७ मधील मार्गदर्शक तत्वानुसार व विहीत केलेल्या कार्यपध्दतीनुसार पुढील कार्यवाही करावी.

०३. सदरचे अनुदान **पाढरकवडा** नगरपरिषदेला वितरीत करण्यासाठी **जिल्हाधिकारी, यवतमाळ यांना 'आहरण व संवितरण अधिकारी 'तसेच ' नियंत्रक अधिकारी ' म्हणून घोषित करण्यात येत आहे.** जिल्हाधिकारी यवतमाळ यांनी सदर निधी पांढरकवडा नगरपरिषदेस तात्काळ वितरीत करावा व झालेल्या खर्चाचे विनियोग प्रमाणपत्र आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, आदिवासी विकास विभाग तसेच नगर विकास विभागाकडे सादर करावे.

०४. या बाबीवर होणारा खर्च मागणी क्र.टी-५, मुख्यलेखाशिर्ष : २२१७- नगर विकास- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- ८० सर्वसाधारण- ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना- ०१- जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०२) नागरी आदिवासी वस्ती सुधारणा (२२१७ १२५९) ३१-सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ मध्ये मंजूर केलेल्या तरतुदीतून भागवावा.

०५. सदरचे आदेश आदिवासी विकास विभागाच्या संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक १९ मार्च, २०११ च्या आदेशानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०३२३१८४५२३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( आय. एम. मोरे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर

सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त,आदिवासी विकास, नाशिक
जिल्हाधिकारी, यवतमाळ
अप्पर आयुक्त, आदिवासी विकास,यवतमाळ
संचालक, नगर रचना, यवतमाळ
उपसंचालक, नगर रचना, पांढरकवडा
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पांढरकवडा
जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ
मुख्याधिकारी, नगरपरिषद पांढरकवडा, जि. यवतमाळ
वित्त विभाग (अर्थ-१९) मंत्रालय, मुंबई
कार्यासन- (का-१२), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
लेखा अधिकारी, नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
नवि-८ यांना शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर प्रत उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने अग्रेषित
निवडनस्ती (नवि-४)